गोदाम दुरूस्तीच्या कामासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत (गोदाम दुरूस्तीची ९ कामे)
सन २०१४-१५

महाराष्ट्र शासन
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११४/५५०/प्र.क्र.७४१/नापु-१६ ब**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२**
**दिनांक: २६ ऑगस्ट, २०१४**

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः गोदादु १११२/२०४/प्र.क्र.१८९/नापु-१६ब, दि. १९ मे,२०१४.
२) शासन निर्णय क्रमांकः गोदादु १११४/प्र.क्र.७१४/नापु-१६ब, दि. १९ मे, २०१४.
३) शासन निर्णय क्रमांकः गोदादु १११४/प्र.क्र.६९८/नापु-१६ब, दि. १९ मे, २०१४.
४) शासन निर्णय क्रमांकः गोदादु १११४/प्र.क्र.६९९/नापु-१६ब, दि. ११ जुलै, २०१४.

**प्रस्तावना**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिका धारकांना जीवनावश्यक वस्तूंचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. सदरहू राज्य शासकीय़ गोदामांच्या दुरूस्तीच्या प्रस्तावांची सार्वजनिक बांधकाम विभागाकडून आवश्यकतेनुसार छाननी केल्यानंतर गोदाम दुरूस्तींच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सन २०१४-१५ मध्ये प्रशासकीय मान्यता दिलेल्या गोदाम दुरूस्तीच्या कामापैकी काही कामास निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासकीय गोदाम दुरूस्तीच्या कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या आदेशामधील अटींच्या अधीन राहून पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निधी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | अंदाजित खर्च (रू.) | सदर आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | नाशिक | नांदगाव | शासकीय गोदाम नागापूर गोदाम क्र.१ | जीर्ण व खराब झालेले आतील बाहेरील प्लास्टर काढुन नवीन करणे, आवश्यक त्या ठिकाणी वीट काम करणे,तुटलेल्या खिडक्यांचे शटर बदलणे, फुटलेली शहाबादी फरशी बदलणे, रंगकाम करणे. | ७,९२,००० | ७,९२,००० |
| २. | नाशिक | नांदगाव | शासकीय गोदाम मनमाड (लाहोर शेड) | गोदाम आवारातील झाडेझुडपे काढणे, जमिनीचा उंचसखल भाग सपाट करणे व निघालेली माती इतरत्र वाहतुक करणे. ६० मिमी आकाराची खडी वाहतुक करून पसरविणे. C.C. १:४:८ ने १० से.मी. जाडीचे करणे. १:४:८ C.C. वर २० से.मी. जाडीचे १:२:४ कारपेट करणे. | ४,६४,१८६ | ४,६४,१८६ |
| ३. | उस्मान ाबाद | वाशी | शासकीय गोदाम पारगाव | सिमेंट कॉक्रींट रस्ता तयार करणे. काळया मातीत खोदकाम करणे. ६० व ८० एम.एम. खडी पुरविणे. कठीण मुरूम | ९,८७,५४७ | ९,८७,५४७ |

| अ.. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | अंदाजित खर्च (रू.) | सदर आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | पुरविणे. एम-१० ब्रेड कॉक्रींट करणे. एम-२० कॉक्रींट अस्तरीकरण करणे. | | |
| ४. | लातूर | लातूर | लातूर गोदाम क्र.४ | खचलेली फरशी व बेड कॉक्रीट काढणे, १० सेंमी जाडीसाठी १:३:६ प्रमाणाचे बेड कॉक्रीट करणे, फरशी दुरुस्त करणे, खराब पत्रे बदलून नवीन पत्रे बसविणे, आतुन व बाहेरुन भिंतीना रंगरंगोटी करणे, खराब असलेले रोलींग शटर बदलणे. | ९,८२,००० | ९,८२,००० |
| ५. | औरंगाबाद | पैठण | आडुळ | जुनी फरशी काढणे, शहाबादी फरशी बसविणे, मुरुम टाकणे, सोलींग करणे, लोखंडी पत्रे टाकणे व इतर (अंदाजपत्रकानुसार) | ९,९६,०८० | ९,९६,०८० |
| ६. | जालना | जालना | शासकीय गोदाम क्र.१ जालना टी.एफ (बदनापूर) बस स्टॅंड जवळील | लोखंडी शटर बसविणे, पन्हाळी बसविणे, आर.सी.सी. इ. (अंदाजपत्रकानुसार) | ९,९८,३१५ | ९,९८,३१५ |

| अ.. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | अंदाजित खर्च (रू.) | सदर आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|
| ७. | जालना | जालना | शासकीय गोदाम क्र.२ जालना टीफ (बदनापूर) बस स्टॅड जवळील | सी.सी.ड्रेन व गोदाम परिसरातील अंतर्गत रस्ते, (अंदाजपत्रकानुसार) | ९,९०,८६१ | ९,९०,८६१ |
| ८. | जालना | जालना | शासकीय गोदाम एआर अंबड नाका जालना (रेल्वे स्टेशन जवळील) | चौकटीसह दरवाजा, खिडक्या काढणे, सिमेंटचे व जीआय शीटसचे पत्रे काढणे, शहाबादी फरशी काढणे, व्हेंटीलेटर बसविणे, जीआय शीटस बसविणे, लोखंडी शटर बसविणे, शहाबादी फरशी बसविणे, सिमेंट कॉंक्रिट इ. (अंदाजपत्रकानुसार) | ९,९३,५९० | ९,९३,५९० |
| ९. | जालना | जालना | शासकीय गोदाम अंबड नाका क्र. २ जालना (रेल्वे स्टेशन जवळील) | सी.सी.ड्रेन व गोदाम परिसरातील अंतर्गत रस्ते, (अंदाजपत्रकानुसार) | ९,९९,६४४ | ९,९९,६४४ |
| | | | | एकूण रू. | ८२,०४,२२३ | ८२,०४,२२३ |

| अ.. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | अंदाजित खर्च (रू.) | सदर आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | एकूण रू. ब्याऐंशी लक्ष,चार हजार दोनशे तेवीस फक्त | | | |

२.. वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करून दिलेल्या शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे तातडीने सुरू करण्य़ात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम दुरूस्ती सुरू झाल्यानंतर प्रथम दुरूस्तीचा संपूर्ण तपशील तसेच संबंधित दुरूस्तीचा दरमहा आढावा घेऊन दुरूस्तीची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

३. सदरील शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

४. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अंभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थल निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा

५. दुरूस्तीस विलंब अथवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.सदरहू निधी ठेव म्हणून वर्ग करता/ठेवता येणार नाही याची नोंद घ्यावी

६. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षामध्ये सदर गोदाम दुरूस्तीचा खर्च "मागणी क्रमांक एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०३)(०२) मुफसल, दत्तमत (२४०८ ०१०८) २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. त्याचप्रमाणे काही कारणास्तव संबधित गोदाम दुरूस्तीचे कामावर उपलब्ध करून दिलेला निधी खर्ची पडण्याची शक्यता नसल्यास त्याबाबतच्या कारणमीमांसेसह शासनास अहवाल सादर करावा.सदरहू आदेशान्वये वितरित केलेला निधी ऑक्टोंबर २०१४ पूर्वी निधी खर्च न झाल्यास सदर निधी काढून घेण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागागर व उपसचिव कार्यालयामार्फत करण्यात यावी.

८. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीची कामे शासनास सादर केलेल्या दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावीत. म्हणजेच शासनास सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण करण्यात यावीत.

९. सदरचे आदेश प्राप्त होताच सदरील तरतूद जिल्हाधिकाऱ्यामार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात यावी.धनादेशाने आहरित करण्यात येऊ नये.

१०. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१ उप भाग-५ मधील अनुक्रमांक ३ व १० नुसार तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६१८००५६५५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pranali Pratap Chavan

Digitally signed by Pranali Pratap Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies & Consumer Protection, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pranali Pratap Chavan
Date: 2014.08.26 17:57:32 +05'30'

(प्र.प्र.चव्हाण)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. उप आयुक्त (पुरवठा), नाशिक, औरंगाबाद.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
३. जिल्हाधिकारी/जिल्हा पुरवठा अधिकारी नाशिक, उस्मानाबाद, औरंगाबाद, लातूर, जालना.

४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक, उस्मानाबाद, औरंगाबाद, लातूर, जालना

५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, उस्मानाबाद, औरंगाबाद, लातूर, जालना.

६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.

७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)

९. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.

१०.नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.

११.सहाय्यक संचालक (संगणक), लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.

१२.निवड नस्ती/नापु-१६ब.